**विभागीय चौकशी प्रलंबित असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना पदोन्नती देताना अवलंबवयाच्या कार्यपध्दतीच्या अनुषंगाने सुचवावयाच्या सुधारणांसंदर्भात करावयाच्या सूचनांकरीता मुदतवाढ देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३१०/कार्या.१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ०६.०५.२०१७

**वाचा :-**

१) **सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः समक्रमांक, दि.०८.०३.२०१७**

**प्रस्तावना :-**

विभागीय चौकशी प्रलंबित असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना पदोन्नती देताना करावयाच्या कार्यवाहीबाबत उपरोक्त वाचा येथील शासन परिपत्रकाद्वारे सुधारीत कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. ही सुधारीत कार्यपध्दती लागू करण्यापूर्वी या कार्यपध्दतीसंदर्भात अधिकारी/कर्मचारी अथवा त्यांच्या संघटनांना काही सूचना/सुधारणा सूचवायच्या असल्यास, त्याबाबत दि.०८.०४.२०१७ पर्यंत विहीत नमुन्यात सुधारणा सुचविण्यात याव्यात, असे उक्त शासन परिपत्रकाद्वारे सुचित करण्यात आले आहे.

या संदर्भात महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघाने अर्थसंकल्पीय अधिवेशन व आर्थिक वर्षाच्या कामकाजात अधिकारी व्यस्त असल्याने उक्त कार्यपध्दतीच्या अनुषंगाने सूचना देण्याचा कालावधी वाढविण्याची विनंती केली होती. सदर विनंतीच्या अनुषंगाने उक्त शासन परिपत्रकाद्वारे मागविण्यात आलेल्या सूचना /सुधारणा सादर करण्याकरीता दि.३१.०५.२०१७ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्याची बाब विचाराधीन होती.

## शासन परिपत्रक :-

प्रस्तावनेत नमूद केलेल्या पार्श्वभूमीवर शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग दि.८.३.२०१७ अन्वये विभागीय चौकशी प्रलंबित असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना पदोन्नती देताना करावयाच्या कार्यवाहीबाबत विहीत करण्यात आलेल्या सुधारीत कार्यपध्दतीबाबत सूचना /सुधारणा सुचविण्याकरीता दि.३१.०५.२०१७ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात येत आहे. अधिकारी/कर्मचारी किंवा त्यांच्या संघटनांकडून या मुदतीनंतर प्राप्त होणाऱ्या सूचनांचा विचार केला जाणार नाही.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०६१५१७०८५८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash
Hanmant
Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2017.05.06 15:20:57 +05'30'

**(सु.ह.उमराणीकर)**
**उप सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५. सर्व मा.संसद सदस्य, /मा. विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६. मा. मुख्य सचिव,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),
   - त्यांनी हे आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावे.
९. *प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१०.*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
११.* प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१२.*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१३.*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
१४.*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद) मुंबई,
१५.*राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१६.*सचिव, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१७.*महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.
१८. *महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई,
१९.*महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर,
२०.*महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा  परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
२१.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई (प्रसिध्दीकरिता ५ प्रती)

२२.ग्रंथपाल , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
२३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२५.मुख्य लेखापरीक्षक (निवासी लेखे), कोंकण भवन, नवी मुंबई,
२६.सर्व विभागीय आयुक्त
२७.सर्व जिल्हाधिकारी
२८. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२९.सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमु ख,
३०.*सर्व अधिकारी/कर्मचाऱ्यांची मान्यता प्राप्त संघटना, (कार्यासन -१६ अ, सामान्य प्रशासन विभागामार्फत)
३१.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
३२.निवड नस्ती.

(*-पत्राद्वारे)